सन २०२३-२४ या वर्षासाठी महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियानासाठी (NRLM) करिता सर्वसाधारण प्रवर्गासाठी (GEN) अर्थसहाय्य.

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास विभाग
शासन निर्णय क्रमांकः मजिअ - २०२३/प्र.क्र.९७/योजना-३
मंत्रालय,मुंबई ४०० ०३२.
दिनांक: २० मार्च, २०२४

वाचा :-

१. शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र.एनआरएलएम-२०११/प्र.क्र.१९६/ योजना-३, दिनांक १८ जुलै, २०११.
२. शासन निर्णय, ग्राम विकास विभाग क्र.मजिअ-२०२३/प्र.क्र.९७/योजना-३, दिनांक ०५ ऑक्टोबर, २०२३.
३. शासन निर्णय, ग्राम विकास विभाग क्र.मजिअ-२०२३/प्र.क्र.९७/योजना-३, दिनांक ०१ डिसेंबर, २०२३.
४. शासन निर्णय, ग्राम विकास विभाग क्र.मजिअ-२०२३/प्र.क्र.९७/योजना-३, दिनांक ०१ फेब्रुवारी, २०२४.
५. केंद्रिय ग्रामीण विकास मंत्रालय, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.जे-१२०२५/०१/२०२३-आरएल (एनआरएलएम_९१ए), दिनांक ०८ मार्च, २०२४.
६. मुख्य कार्यकारी अधिकारी, एसएसआरएलएम, बेलापूर, नवी मुंबई यांचे पत्र क्र.एमएसआरएलएम/लेखा/६०२७/२०२४, दिनांक ११ मार्च, २०२४.

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाने सन २०२३-२४ या आर्थिक वर्षासाठी महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान NRLM सर्वसाधारण (GEN) प्रवर्गाकरिता संदर्भाधीन क्र.५ अन्वये दुसऱ्या हप्त्याचा दुसरा टप्पा म्हणून रु.१४१,१८,५४,०००/- इतका निधी वितरीत केलेला आहे. सदर निधी राज्याच्या एकत्रित निधीमध्ये जमा झालेला आहे. सन २०२३-२४ मध्ये महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान (MSRLM) अंतर्गत सर्वसाधारण (General) प्रवर्ग केंद्र हिस्सा (२५०१ २९०८) याकरिता रु.४९४,११,५२,०००/- इतकी तरतूद अर्थसंकल्पीत करण्यात आली असून त्यापैकी रु.३५८,५७,६२,०००/- इतकी रक्कम अद्यापर्यंत वितरीत केली आहे तसेच राज्य हिस्सा (२५०१ २७७५) याकरिता रु.३२९,४१,०१,०००/- इतकी तरतूद अर्थसंकल्पीत करण्यात आली त्यापैकी रु.२३९,०५,०८,०००/- इतकी रक्कम अद्यापर्यंत वितरीत केली आहे. तथापि, केंद्र हिस्सा (२५०१ २९०८) याकरीता अर्थसंकल्पीत केलेल्या तरतूदीमध्ये रु.१३५,५३,८९,०००/- इतकी तरतूद शिल्लक असल्याने उर्वरित रक्कम रु.५,६४,६५,०००/- इतकी तरतूद तसेच केंद्र समरुप राज्य हिस्सा (२५०१

२७९३) याकरीता अर्थसंकल्पीत केलेल्या तरतूदीमध्ये रु.९०,३५,९२,०००/- इतकी तरतूद शिल्लक असल्याने उर्वरित रक्कम रु.३,७६,४४,०००/- इतकी तरतूद नियोजन व वित्त विभागाने पुनर्विनियोजनद्वारे उपलब्ध करुन दिली आहे. त्यानुसार सदर केंद्र हिस्सा रु.१४१,१८,५४,०००/- व केंद्र हिस्सा समरुप राज्य हिस्सा रु.९४,१२,३६,०००/- असा एकूण रु.२३५,३०,९०,०००/- इतका निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

सन २०२३-२४ मध्ये महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान (MSRLM) अंतर्गत सर्वसाधारण प्रवर्ग (GEN) केंद्र हिस्सा (२५०१ २९०८) याकरिता केलेल्या तरतूदीतून रु.१४१,१८,५४,०००/- (रुपये एकशे एक्केचाळीस कोटी अठरा लाख चौपन्न हजार फक्त) व केंद्र हिस्सा समरुप राज्य हिस्सा (२५०१ २७७५) याकरिता केलेल्या तरतूदीतून रु.९४,१२,३६,०००/- (रुपये चौऱ्याण्णव कोटी बारा लाख छत्तीस हजार फक्त) असा एकूण रु.२३५,३०,९०,०००/- (रुपये दोनशे पस्तीस कोटी तीस लाख नव्वद हजार फक्त) इतका निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणाली (B.D.S) द्वारे महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियानास वितरीत करण्यात येत आहे.

२. सदर रक्कम उप संचालक (वित्त व लेखा), महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान, बेलापूर, नवी मुंबई यांच्याकडे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून सुपूर्द करण्यात येत आहे.

३. सदर रक्कम रु.१४१,१८,५४,०००/- (रुपये एकशे एक्केचाळीस कोटी अठरा लाख चौपन्न हजार फक्त) चा खर्च "मागणी क्र.एल-३, २५०१ ग्रामविकासासाठी विशेष कार्यक्रम, ०६, स्वयंरोजगार कार्यक्रम, १०१, सुवर्णजयंती ग्राम स्वयंरोजगार योजना, (०१) सुवर्णजयंती ग्राम स्वयंरोजगार, (१)(१३)महाराष्ट्र राज्य ग्रामीण उपजीविकाअभियान याअंतर्गत अनुसूचित जमाती व्यतिरिक्त इतर लाभार्थ्यांना वित्तीय सहाय्य (केंद्र हिस्सा) (सर्वसाधारण) (६०%) (कार्यक्रम), ३३,अर्थसहाय्य (२५०१ २९०८)" या लेखाशिर्षाखाली व रु.९४,१२,३६,०००/- (रुपये चौऱ्याण्णव कोटी बारा लाख छत्तीस हजार फक्त) चा खर्च “मागणी क्र.एल ३, २५०१, ग्रामविकासासाठी विशेष कार्यक्रम, ०६, स्वयंरोजगार कार्यक्रम, १०१, सुवर्णजयंती ग्राम स्वयंरोजगार योजना, (०१) सुवर्णजयंती ग्राम स्वयंरोजगार , (०१)(०५) महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियानाच्या अनुसूचित जाती / जमाती व्यतिरिक्त लाभार्थ्यांना अर्थसहाय्य (कार्यक्रम), ३३,अर्थसहाय्य, (२५०१ २७७५)” या लेखाशिर्षाखाली सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात अर्थसंकल्पीत केलेल्या तरतूदी मधून भागवावा.

४. हे अनुदान ज्या प्रयोजनाकरीता मंजूर करण्यात आलेले आहे, त्याच प्रयोजनाकरीता खर्च करण्यात यावे. अन्यथा ती वित्तीय अनियमितता समजण्यात येईल, याची अमंलबजावणी करणाऱ्या अधिकाऱ्यांनी नोंद घ्यावी.

५. या शासन निर्णयान्वये मंजूर केलेले अनुदान कोषागारातून काढल्यानंतर पुढील माहिती त्वरीत लेखाधिकारी कार्यासन क्रमांक योजना-२, ग्राम विकास विभाग यांचेकडे पाठवावी. १) मंजूर केलेली रक्कम, २) कोषागारातून काढलेली रक्कम, ३) रक्कम काढल्याचा प्रमाणक क्रमांक व दिनांक, ४) महालेखापाल कार्यालयातील रक्कमेशी ताळमेळ केल्याचे प्रमाणपत्र, ४) या योजनेची प्रगती / सद्य:स्थिती दर ४ महिन्यांनी शासनास कळविण्यात यावी.

६. सदर शासन निर्णय वित्त विभाग परिपत्रक्र दिनांक १२ एप्रिल, २०२३ व ०८ डिसेंबर, २०२३ अन्वये दिलेल्या केंद्र पुरस्कृत योजनांसाठी निधी तसेच राज्य शासनाचा समरुप हिस्सा प्रशासकीय विभागांने त्यांचे स्तरावर वितरित करण्याच्या प्रदान केलेल्या अधिकारानुसार तसेच वित्त विभागाचा अनौ.संदर्भ क्र.२३४/२०२४/व्यय-१५, दिनांक १६.०३.२०२४ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३२०१६०१४८९४२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VIVEK ASHOK DAINGADE

Digitally signed by VIVEK ASHOK DAINGADE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, 2.5.4.20=53c2fccec74ddb1c052589e5cbaed9d19ba0d0043df169c83be27faeb8bf045b, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=670EB0FA576F65F4406D031E11A90EA6FFB3AEFB253D401F5CED2AD1A6605DBF, cn=VIVEK ASHOK DAINGADE
Date: 2024.03.20 17:09:46 +05'30'

(विवेक दाईंगडे)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) महालेखापाल (लेखा परिक्षा) व (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
२) प्रधान सचिव व निवासी आयुक्त (गुंतवणूक व राजशिष्टाचार), महाराष्ट्र सदन, नवी दिल्ली.
३) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान, ५ वा मजला, दक्षिण विंग (एसबीआय साईड),सिडको भवन, सीबीडी बेलापूर, नवी मुंबई - ४०० ६१४.

४) उप संचालक (वित्त व लेखा), महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान, ५ वा मजला, दक्षिण विंग (एसबीआय साईड),सिडको भवन, सीबीडी बेलापूर, नवी मुंबई - ४०० ६१४.
५) जिल्हा कोषागार अधिकारी , ठाणे,
६) उप कोषागार अधिकारी, कोकण भवन, बेलापूर, नवी मुंबई.
७) नियोजन विभाग (१४१४), मंत्रालय, मुंबई-३२.
८) वित्त विभाग (व्यय-१५) व ( अर्थ-१७) मंत्रालय मुंबई-३२.
९) कार्यासन अधिकारी, वित्त-१, वित्त-७, योजना-२, ग्राम विकास विभाग.
१०) निवड नस्ती.